


# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन ज्ञापन क्रमांक : दुरूस्ती-०२२१/प्र.क्र.१७/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २२ मार्च, २०२२.

**विषय :- नागपाडा पोलीस रुग्णालय, मुंबई येथील दुरुस्तीच्या कामासाठी प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.**

**संदर्भ :-** पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. CP/ACS(H)/D-८(४)/ Bldg.Br./Nagpada Hospital/LSJ/Gov-२००/२०२१,दिनांक २४/०९/२०२१.

**ज्ञापन.-**

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांनी **नागपाडा पोलीस रुग्णालय, मुंबई येथील दुरुस्ती कामासाठी** कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई (सा.बां.) विभाग, वरळी, मुंबई यांचेकडून **रु.९१,१६,१०६/- व रुपये ९५,५३,८५०/- अशा दोन भागामध्ये प्राप्त झालेल्या एकूण रु.१,८६,६९,९५६/- (अक्षरी रुपये एक कोटी शहाऐंशी लाख एकोणसत्तर हजार नऊशे छप्पन्न फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास** प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा पुढीलप्रमाणे प्रस्ताव सादर केला आहे.

| अ.क्र. (१) | कामाचे नाव (२) | खर्चाचे अंदाज (३) |
|---|---|---|
| १. | ***Additional Work for Officers and Staff Health Check up Centre at Nagpada Police Hospital[ Nagpada***<br>*1.*Providing and Fixing Aluminium sliding window at Main building **(₹19,33,438.00)**<br>*2.*)Providing melamine polish for doors and windows and false ceiling at Main building **(₹19,90,397.00)**<br>*3.*Providing G.I. Precoated Sheets for Patient Seating arrangment at Main building **(₹12,43,483.00)**<br>*4.*External Painting works at Main building **(₹19,81,771.00)**<br>*5.*Providing and Fixing Full hight storage and roller blinds at Nagpada Police Hospital **(₹19,67,017.00)** | रु. ९१,१६,१०६/- |
| २. | ***Additional Work for Officers and Staff Health Check up Centre at Nagpada Police Hospital[ Nagpada***<br>1. Main building Heritage Repairs and Pointing works **(₹18,63,404.00)**<br>2. Repairs to Water supply arrangement and sanitary fitting works at Main building **(₹19,94,735.00)**<br>3. Providing and Fixing Soft Fiber Acoustical Suspended Ceiling System with Optra at Main Building **(₹19,85,335.00)**<br>4. Providing and applying wall care putty and Painting works at Main building **(₹17,77,502.00)**<br>5. Providing and Fixing doors at Main Building **(₹19,32,874.00)** | रु. ९५,५३,८५०/- |
| एकूण- (रुपये एक कोटी शहाऐंशी लाख एकोणसत्तर हजार नऊशे छप्पन्न फक्त) | | रु.१,८६,६९,९५६/- |

२. उक्त कामासाठी उप अभियंता, उत्तर (सा.बां.) उप विभाग, दादर, मुंबई-२८ यांनी सन २०२०-२१ च्या सार्वजनिक बांधकाम विभागाच्या ई-दरसूचीनुसार तयार केलेले एकूण **रु.१,८६,६९,९५६/-** इतक्या खर्चाचे अंदाजपत्रक कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई (सा.बां.) विभाग, वरळी, मुंबई यांनी साक्षांकित केले आहेत. तसेच यापूर्वी **कोविड-१९ या सांसर्गिक रोगाच्या पार्श्वभूमीवर नागपाडा पोलीस रुग्णालय सर्व सुखसोईने कार्यान्वित करण्यासाठी** मुख्य अभियंता, सा.बा. मुंबई विभाग यांनी तांत्रिक मान्यता प्रदान केलेल्या एकत्रित **रु.४,०६,१६,८४९/- अंदाजपत्रकीय खर्चापैकी उपरोक्त** अंदाजपत्रकास शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.विअसु-२०१५/प्र.क्र.२१८/इमा-२, दि.१०/०८/२०२१ अन्वये महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका १९८४ मधील परिशिष्ट ४२ मधील अ.क्र.१९ नुसार वित्तीय अधिकारामध्ये केलेल्या सुधारणा प्रमाणे रु.२५० लक्ष पर्यंतच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिक मान्यता व निविदा प्रक्रियेचे अधिकार अधिक्षक अभियंता यांना प्रदान करण्यात आल्याने अधिक्षक अभियंता, मुंबई (सा.बां.) मंडळ, मुंबई यांनी प्रतिस्वाक्षरी केली आहे.

३. त्या अनुसार **नागपाडा पोलीस रुग्णालय, मुंबई येथील दुरुस्ती कामासाठी कार्यकारी** अभियंता, मध्य मुंबई (सा.बां.) विभाग, वरळी, मुंबई यांचेकडून **रु.९१,१६,१०६/- व रुपये ९५,५३,८५०/- अशा दोन भागामध्ये प्राप्त झालेल्या एकूण रु.१,८६,६९,९५६/- (अक्षरी रुपये एक कोटी शहाऐंशी लाख एकोणसत्तर हजार नऊशे छप्पन्न फक्त)** इतक्या खर्चाच्या अंदाजास, पुढील अटींवर, याद्वारे, प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१) निधी उपलब्ध झाल्याशिवाय काम सुरू करू नये.
२) खर्चाचे अंदाज हे पोलीस सह आयुक्त (प्रशासन), बृहन्मुंबई, यांनी साक्षांकित करणे आवश्यक आहे.

४. उक्त रक्कम अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथून आहरित करण्यासाठी पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, मुंबई यांना **"नियंत्रक अधिकारी"** म्हणून घोषित करण्यात येत आहे.तर त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिकाऱ्याला **"आहरण व संवितरण अधिकारी"** म्हणून घोषित करण्यात येत आहेत.

५. उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग--मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस, ००, १०८, राज्य मुख्यालय पोलीस, (०२) शहर पोलीस, (०२)(०१) शहर पोलीस-आस्थापना (दत्तमत)(अनिवार्य) (२०५५ ००९७), २७, लहान बांधकामे, याखाली त्या - त्या वर्षात उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हे ज्ञापन, शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२ दिनांक १७ एप्रिल, २०१५ व दिनांक २० सप्टेंबर, २०१९ अन्वये वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारान्वये व सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परि.क्र.१३४ (३) मधील तरतुदीनुसार शासन परिपत्रक, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र.संकीर्ण-२०१९/प्रक्र१०/इमा-२, दि.२५.०९.२०१९ मधील तरतूदीनुसार व शासन निर्णय वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१ अन्वये दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** हे शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या [www.maharashtra.gov.in](http://www.maharashtra.gov.in) या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२२०३२२१६३७५५९२२९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NARAYAN
BIRA MANE

Digitally signed by NARAYAN BIRA MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ï¿¿HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1dfb457576797050f19aafaa495673fc843c789942459cd39fc5561071b4a70c, pseudonym=D53E4970DA18F4240576F3F34F92F7E069E6A52A, serialNumber=79C09BA352C5B3E65B259113F1CDCFAB29FB961D4EA9A24411D7F622D2ED20BF, cn=NARAYAN BIRA MANE
Date: 2022.03.22 17:57:00 +05'30'

**( नारायण बिरा माने )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

**प्रत-**

१) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई.
२) कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई (सा.बां.) विभाग, वरळी, मुंबई.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
५) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
६) कार्यासन अधिकारी (इमा-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) कार्यासन अधिकारी (व्यय-७/ विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) निवड फाईल (पोल-७).